**पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर सोलापूर विद्यापीठ येथे पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर यांचे स्मारक तसेच टॉवरचे बांधकाम करण्याकरीता निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : स्मारक-२०२१/प्र.क्र.२२/विशि-२**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०१ ऑगस्ट, २०२३.

**संदर्भ :-** १. विभागाचा समक्रमांकाचा दि.०७.१२.२०२१ रोजीचा शासन निर्णय.
२. विभागाचा समक्रमांकाचा दि.१४.०२.२०२२ व दि.२१.०२.२०२३ रोजीचा शासन निर्णय.
३. कुलसचिव, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर सोलापूर विद्यापीठ, सोलापूर यांचे दि.०९.०६.२०२३ रोजीचे पत्र.
४. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/ अर्थ-३ दि.१२.०४.२०२३.

**प्रस्तावना :-** पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर सोलापूर विद्यापीठाच्या परिसरात पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर यांच्या स्मारकासाठी चबूतरा बांधकाम, लॅन्डस्केप व सुशोभीकरण तसेच टॉवर बांधकामाच्या रु.१४,२४,९२,२३८/- इतक्या किमतीच्या अंदाजपत्रकास संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदरहु प्रशासकीय मान्यतेस अनुसरुन संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये एकूण रु.२,७३,९१,०००/- एवढा निधी वितरीत करण्यात आला आहे. पुढील बांधकाम करण्यासाठी निधीची आवश्यकता असल्याने उर्वरित निधी वितरीत करण्याची विद्यापीठाने संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये विनंती केली आहे. संदर्भ क्र.४ येथील वित्त विभागाच्या दि.१२.०४.२०२३ च्या परिपत्रकान्वये सन २०२३-२४ मधील निधी वितरीत करण्याबाबतच्या सुचना देण्यात आल्या आहेत. सदरहू सुचनेतील अटींच्या अधिन राहून सदरहू बांधकाम करण्यासाठी निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर सोलापूर विद्यापीठ येथे पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर यांचे स्मारक तसेच टॉवरच्या बांधकामासाठी रु.४,००,००,०००/- (अक्षरी रुपये चार कोटी फक्त) इतका निधी खालील अटींच्या अधिन राहून मंजूर करण्यात येत आहे.

१. हा निधी प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेतच वितरीत तथा आहरीत करण्यात यावा.
२. चालू आर्थिक वर्षात विधीमंडळाच्या निदर्शनास आणलेल्या कामनिहाय तरतूदीपेक्षा जादा खर्च करण्यात येऊ नये.
३. कोणत्याही परिस्थितीत संबंधित अधिक्षक अभियंता यांनी प्रशासकीय मान्यतेच्या रकमेपेक्षा जास्त खर्च कामांवर करु नये.
४. संबंधित कार्यकारी अभियंता यांनी कामाची प्रगती व झालेला खर्च याचा अहवाल संबंधित विद्यापीठाचे कुलसचिव व संचालक, उच्च शिक्षण यांच्याकडे पाठविण्याची व्यवस्था करावी.
५. विषयांकित कामाकरिता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही. या दृष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

२. हा निधी सार्वजनिक बांधकाम विभागाने विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन वितरीत करावा. निधी वितरीत करतांना वरील अटी व शर्ती विचारात घ्याव्यात. तसेच वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल-२, नागपूर यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणीकरीता विद्यापीठाने सादर केली पाहिजेत.

३. विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी मंजुर केलेल्या अनुदानाचा वापर त्याच उद्दिष्टासाठी करावा. तसेच विहीत कालावधीमध्ये सदरचा खर्च पूर्णपणे करण्यात येईल याची दक्षता घेण्यात यावी आणि त्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र (Utilization Certificate) संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचेमार्फत शासनास विहित वेळेत सादर करण्यात यावे.

४. सदरहू बांधकामावर होणारा खर्च "मागणी क्रमांक - एच-८, मुख्यलेखाशिर्ष- ४२०२ शिक्षण, सर्वसाधारण शिक्षण २०३, विद्यापीठीय व उच्च शिक्षण (४२०२००७९) या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२०२४ मधील मंजूर तरतुदीतून खर्ची टाकण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, महाराष्ट्र विनियोजन अधिनियम २०२३, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/ अर्थ-३ दि.१२.०४.२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे. या शासन निर्णयातील परिशिष्ट मधील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे.

७. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२३०८०३११३६१४१२०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SHARAD SARJERAO KOKATE

Digitally signed by SHARAD SARJERAO KOKATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=be7c6620763057633615219444ed5ba258ae7d29f78cddb94fc3e83bfa2424200, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=95D25EC736C5F76DA241E96AD9552FF908EFC6582DF4A4ECADD1C4C6CD038195, cn=SHARAD SARJERAO KOKATE
Date: 2023.08.03 11:38:35 +05'30'

**( शरद कोकाटे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल तथा कुलपती यांचे उपसचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. कुलगुरु, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर, सोलापूर विद्यापीठ, सोलापूर.
४. कुलसचिव, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर, सोलापूर विद्यापीठ, सोलापूर.
५. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, सोलापूर.
७. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सोलापूर.
८. कार्यासन अर्थसंकल्प-२, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१०. प्रधान सचिव (व्यय) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
११. उप सचिव (विशि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१२. निवडनस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.